दादा भगवान प्ररूपित

# क्रोध



क्रोध म्हणजे प्रकट अग्नी, आधी स्वत:ला जाळतो नंतर समोरच्याला जाळतो.

Marathi

दादा भगवान प्ररूपित

# क्रोध

मूळ गुजराती संकलन : डॉ. नीरूबहन अमीन

अनुवाद : महात्मागण

**प्रकाशक** : अजीत सी. पटेल
दादा भगवान विज्ञान फाउंडेशन
1, वरूण अपार्टमेंट, 37, श्रीमाळी सोसायटी,
नवरंगपुरा पुलिस स्टेशनच्या समोर,
नवरंगपुरा, अहमदाबाद - 380009,
Gujarat, India.
**फोन :** +91 79 3500 2100



**प्रथम आवृत्ति** : 1000 फेब्रुवारी 2009
**रीप्रिंट** : 10000 सप्टेंबर 2011 ते नोव्हेंबर 2014
**नयी रीप्रिंट** : 5000 ऑगस्ट 2017

**भाव मूल्य** : 'परम विनय' आणि
'मी काहीच जाणत नाही', हा भाव!

**द्रव्य मूल्य** : 10 रुपये

**मुद्रक** : अंबा मल्टीप्रिंट
B-99, इलेक्ट्रॉनिक्स GIDC,
क-6 रोड, सेक्टर-25,
गांधीनगर-382044.
Gujarat, India.
**फोन :** +91 79 3500 2142

**ISBN/eISBN** : 978-81-89933-47-0

Printed in India

# त्रिमंत्र







नमो अरिहंताणं
नमो सिद्धाणं
नमो आयरियाणं
नमो ऊवज्झायाणं
नमो लोए सव्वसाहूणं
एसो पंच नमुक्कारो
सव्व पावप्पणासणो
मंगलाणं च सव्वेसिं
पढमं हवइ मंगलं ॥ १ ॥
ॐ नमो भगवते वासुदेवाय ॥ २ ॥
ॐ नमः शिवाय ॥ ३ ॥
जय सच्चिदानंद



# दादा भगवान कोण ?

जून १९५८ संध्याकाळची अंदाजे सहाची वेळ, सुरत स्टेशनवर अलोट गर्दी होती. रेल्वेच्या प्लेटफॉर्म नंबर तीनच्या बाकावर बसलेल्या श्री अंबालाल मूळजीभाई पटेल रूपी देहमंदिरात नैसर्गिक स्वरूपात कित्येक जन्मांपासून व्यक्त होण्यासाठी आतूर असलेले 'दादा भगवान' संपूर्णपणे प्रकट झाले आणि निसर्गाने सर्जन केले अध्यात्माचे अद्‌भुत आश्चर्य! एका तासात विश्वदर्शन लाभले! मी कोण? भगवंत कोण? जग कोण चालवत आहे? कर्म म्हणजे काय? मुक्ती कशाला म्हणतात? इत्यादी जगातील सर्व आध्यात्मिक प्रश्नांची रहस्ये संपूर्णपणे प्रकट झाली. अशाप्रकारे निसर्गाने विश्वाला प्रदान केले एक अद्वितीय, संपूर्ण दर्शन आणि ह्याचे माध्यम बनले अंबालाल मूळजीभाई पटेल, जे होते गुजरातच्या चरोतर जिल्ह्यातील भादरण गावचे पाटील, कॉन्ट्रॅक्टचा व्यवसाय करणारे आणि तरीही पूर्ण वीतराग पुरुष.

त्यांना प्राप्ती झाली तशी ते फक्त दोन तासात इतर मुमुक्षुनां सुद्धा आत्मज्ञानाची प्राप्ती करवित असत, त्यांच्या सिद्ध झालेल्या अद्‌भुत ज्ञान प्रयोगाद्वारे. त्याला अक्रम (क्रमविरहीत) मार्ग म्हटले जाते. अक्रम म्हणजे क्रमाशिवायचा आणि क्रम म्हणजे पायरी पायरीने, क्रमाक्रमाने वर चढणे! अक्रम म्हणजे लिफ्ट मार्ग! शॉर्ट कट!

ते स्वत: प्रत्येकाला 'दादा भगवान कोण?' याबद्दलची फोड करून देताना म्हणायचे की, ''हे दिसतात ते 'दादा भगवान' नाहीत. हे तर 'ए.एम. पटेल' आहेत. आम्ही ज्ञानी पुरुष आहोत आणि आत प्रकट झाले ते दादा भगवान आहेत. दादा भगवान तर 'चौदालोक'चे नाथ आहेत, ते तुमच्यात पण आहेत, सर्वांमध्ये आहेत! तुमच्यात अव्यक्त रुपात आहेत आणि 'येथे' माझ्या आत संपूर्णपणे व्यक्त झालेले आहेत! माझ्या आत प्रकट झालेले 'दादा भगवान' यांना मी पण नमस्कार करतो.''

व्यापारात धर्म असावा परंतु धर्मात व्यापार नसावा. या सिद्धांताने त्यांनी आपले संपूर्ण जीवन व्यतीत केले. संपूर्ण जीवनात त्यांनी कधीही, कोणाकडूनही पैसे घेतले नाहीत, उलट स्वत:च्या व्यवसायातून झालेल्या फायद्यातून भक्तांना यात्रा करवित असत.

# निवेदन

ज्ञानी पुरुष संपूज्य दादा भगवान यांच्या श्रीमुखातून अध्यात्म आणि व्यवहारज्ञानासंबंधित जी वाणी निघाली, तिला रेकॉर्ड करून संकलन व संपादन करून पुस्तकाच्या रूपाने प्रकाशित केले जात आहे. विभिन्न विषयांवर निघालेल्या सरस्वतीचे अद्‌भुत संकलन ह्या पुस्तकात झाले आहे, जे नवीन वाचकांसाठी वरदान रूप सिद्ध होईल.

प्रस्तुत अनुवादामध्ये असे विशेष ध्यान ठेवलेले आहे की प्रत्येक वाचकाला दादाश्रींची प्रत्यक्ष वाणीच ऐकली जात आहे असा अनुभव व्हावा. याच कारणाने कदाचित काही ठिकाणी अनुवादाची वाक्य रचना मराठी व्याकरणानुसार त्रुटीपूर्ण जाणवेल, परंतु तिथे जर आशय समजून वाचण्यात आले तर अधिक लाभदायी होईल.

प्रस्तुत पुस्तकात काही ठिकाणी कंसात दर्शविलेले शब्द किंवा वाक्य दादाश्रींद्वारा बोलल्या गेलेल्या वाक्यांना अधिक स्पष्टतापूर्वक समजावण्यासाठी लिहिले गेले आहेत. तसेच काही ठिकाणी इंग्रजी शब्दांना मराठी अर्थाच्या रूपात ठेवले गेले आहेत. दादाश्रींच्या श्रीमुखातून निघालेले काही शब्द जसेच्या तसेच *इटालिक्स* मध्ये ठेवलेले आहेत, कारण त्या शब्दांसाठी मराठी भाषेत असे शब्द नाहीत की जे त्याचा पूर्ण अर्थ देऊ शकतील. तरी पण त्या शब्दांचे समानार्थी शब्द कंसात तसेच पुस्तकाच्या शेवटी पण दिले गेले आहेत.

ज्ञानींच्या वाणीला मराठी भाषेत यथार्थ रूपाने अनुवादित करण्याचा प्रयत्न केला आहे. परंतु दादाश्रींच्या आत्मज्ञानाचा आशय जसा आहे तसा तर आपल्याला गुजराती भाषेतच अवगत होईल. ज्यांना ज्ञानाचा गहन अर्थ समजून घ्यायचा असेल, ज्ञानाचे खरे मर्म समजायचे असेल त्यांनी ह्या हेतूने गुजराती भाषा शिकावी असा आमचा अनुरोध आहे. अनुवादासंबंधी उणीवांबद्दल आपले क्षमा प्रार्थी आहोत.

# दादा भगवान फाउन्डेशनची प्रकाशित मराठी पुस्तकें

1. भोगतो त्याची चूक
2. एडजस्ट एवरीव्हेर
3. जे घडले तोच न्याय
4. संघर्ष टाळा
5. मी कोण आहे ?
6. क्रोध
7. चिंता
8. प्रतिक्रमण (सं)
9. भावना सुधारे जन्मोजन्म
10. कर्माचे विज्ञान
11. पाप-पुण्य
12. आई-वडील आणि मुलांचा व्यवहार (सं)
13. पति-पत्नीचा दिव्य व्यवहार (सं)
14. समजपूर्वक प्राप्त ब्रह्मचर्य (सं)
15. मानव धर्म
16. मृत्युवेळी, आधी आणि नंतर
17. सेवा-परोपकार
18. दान
19. त्रिमंत्र
20. वर्तमान तीर्थंकर श्री सीमंधर स्वामी
21. चमत्कार
22. सत्य-असत्याचे रहस्य
23. वाणी, व्यवहारात (सं)
24. पैशांचा व्यवहार (सं)
25. क्लेश रहित जीवन
26. निजदोष दर्शनाने... निर्दोष!
27. प्रेम
28. गुरू-शिष्य
29. अहिंसा
30. आप्तवाणी-1, 2, 3

# हिन्दी

1. आत्मसाक्षात्कार
2. ज्ञानी पुरुष की पहचान
3. सर्व दु:खों से मुक्ति
4. कर्म का सिद्धांत
5. आत्मबोध
6. मैं कौन हूँ ?
7. पाप-पुण्य
8. भुगते उसी की भूल
9. एडजस्ट एवरीव्हेयर
10. टकराव टालिए
11. हुआ सो न्याय
12. चिंता
13. क्रोध
14. प्रतिक्रमण (सं, ग्रं)
16. दादा भगवान कौन ?
17. पैसों का व्यवहार (सं, ग्रं)
19. अंत:करण का स्वरूप
20. जगत कर्ता कौन ?
21. त्रिमंत्र
22. भावना से सुधरे जन्मोंजन्म
23. चमत्कार
24. प्रेम
25. समझ से प्राप्त ब्रह्मचर्य (सं, पू, उ)
28. दान
29. मानव धर्म
30. सेवा-परोपकार
31. मृत्यु समय, पहले और पश्चात्
32. निजदोष दर्शन से... निर्दोष
33. पति-पत्नी का दिव्य व्यवहार (सं)
34. क्लेश रहित जीवन
35. गुरु-शिष्य
36. अहिंसा
37. सत्य-असत्य के रहस्य
38. वर्तमान तीर्थकर श्री सीमंधर स्वामी
39. माता-पिता और बच्चों का व्यवहार (सं)
40. वाणी, व्यवहार में... (सं)
41. कर्म का विज्ञान
42. सहजता
43. आप्तवाणी - 1 से 9
52. आप्तवाणी - 13 (पूर्वार्ध व उत्तरार्ध)
54. आप्तवाणी - 14 (भाग-1, 2)
56. ज्ञानी पुरुष (भाग-1)

**( सं - संक्षिप्त, ग्रं - ग्रंथ, पू - पूर्वार्ध, उ - उत्तरार्ध )**

★ **दादा भगवान फाउन्डेशन द्वारे गुजराती आणि इंग्रजी भाषेत सुद्धा बरीच पुस्तके प्रकाशित झाली आहे। वेबसाइट www.dadabhagwan.org वर सुद्धा आपण ही सगळी पुस्तके प्राप्त करू शकता।**

★ **प्रत्येक महिन्यात हिन्दी, गुजराती आणि अंग्रेजी भाषेत दादावाणी मेगेझीन प्रकाशित करीत आहे।**

# संपादकीय

क्रोध हा कमकुवतपणा आहे, लोक त्यास बहादुरी समजतात. क्रोध करणाऱ्यापेक्षा क्रोध न करणाऱ्याचा प्रभाव विशेष पडतो!

साधारणपणे जेव्हा आपल्या मनासारखे घडत नाही, समोरची व्यक्ती आपले म्हणणे समजत नसेल, मान्य करत नसेल, डिफरन्स ऑफ व्ह्यू पॉइंट (मतभेद) असेल तेव्हा क्रोध येतो. काही वेळा आपले म्हणणे खरे असेल आणि कोणी आपल्याला खोटे ठरवत असेल तेव्हा सुद्धा क्रोध येतो. अरे, पण आपले खरे हे आपल्या दृष्टीकोनातून ना! समोरच्या व्यक्तीच्या दृष्टीकोनातून तोही स्वतःला खरेच समजत असतो ना! कित्येकदा काही सुचतच नाही, पुढचा मार्ग दिसत नाही, काय करायचे ते समजत नाही, तेव्हाही क्रोध येतो.

अपमान होतो तेव्हा क्रोध येतो, नुकसान झाले तर क्रोध येतो, अशा प्रकारे मानाच्या रक्षणासाठी लोभाच्या रक्षणासाठी क्रोध केला जातो. तिथे मान आणि लोभ या कषायांपासून मुक्त होण्यासाठी जागृतीत राहणे आवश्यक आहे. नोकराच्या हातातून कप-बशा फुटल्या म्हणून क्रोध करतात आणि जावयाचा हाताने फुटल्या तर? तेव्हा क्रोध कसा ताब्यात ठेवतात! म्हणजे हे सर्व बिलीफ (मान्यता) वरच आधारित आहे ना! कोणी आपले नुकसान करतो किंवा अपमान करतो ते आपल्याच कर्माचे फळ आहे, करणारा तर निमित्तच आहे अशी समज फिट झालेली असेल तरच क्रोध होण्याचे थांबेल.

जेथे जेथे आणि जेव्हा जेव्हा क्रोध येतो तेव्हा त्याची नोंद करावी आणि तिथे आपण जागृत राहावे. ज्याला आपल्या क्रोधामुळे दुःख झाले असेल त्याचे प्रतिक्रमण करावे पश्चाताप करावा आणि पुन्हा असे करणार नाही, असा दृढ निश्चय करावा. कारण आपण ज्याच्यावर क्रोध करतो त्याला दुःख होते, म्हणून तो वैर बांधतो आणि पुढच्या जन्मी परत भेटतो (वैराच्या वसूलीसाठी)!

आई–वडील स्वतःच्या मुलांवर आणि गुरु स्वतःच्या शिष्यांवर क्रोधित होतात तरीही ते पुण्य बांधतात, कारण त्यामागे त्यांचा हेतू त्यांच्या भल्यासाठी आहे, त्यांना सुधारण्यासाठी आहे. हेतू जर स्वार्थासाठी असेल तर पाप बांधेल. वीतराग भगवंतांची समज किती खोलवरची आहे, किती सूक्ष्म आहे ते तरी पाहा!

प्रस्तुत ग्रंथात क्रोध की जो पुष्कळ त्रास देणारा, उघडपणे दिसून येणारा कषाय (दोष) आहे त्याची पूर्ण समज सविस्तरपणे संकलित करून प्रकाशित केली गेली आहे. ती सुज्ञ वाचकांना क्रोधापासून मुक्त होण्यासाठी खूपच मदतरूप होईल, हीच प्रार्थना.

**–डॉ. नीरूबहन अमीन**

# क्रोध

## कोण मानतो, 'मी चुकीचा?'

**प्रश्नकर्ता :** आपले खरे असतानाही आपल्याला चुकीचे ठरवले जाते, तेव्हा आतमध्ये त्याच्यावर क्रोध येतो. तर तेव्हा लगेच क्रोध येऊ नये, यासाठी काय करावे?

**दादाश्री :** हो, पण तुम्ही बरोबर असाल तेव्हा ना? वास्तवात तुम्ही बरोबर असता का? तुम्ही खरे आहात असे तुम्हाला वाटते?

**प्रश्नकर्ता :** आम्हाला आमचा आत्मा सांगतो की, आम्ही खरे आहोत.

**दादाश्री :** हे म्हणजे तुम्हीच जज, तुम्हीच वकील आणि तुम्हीच आरोपी, मग तुम्ही बरोबरच असणार ना? तुम्ही चुकीचे नसणारच ना? समोरच्यांना पण असेच वाटते की मीच बरोबर आहे. तुम्हाला समजले?

## हा सगळा आहे कमकुवतपणा

**प्रश्नकर्ता :** परंतु मला असे विचारायचे होते की, अन्यायाची चीड येते, ते तर चांगलेच आहे ना? एखाद्या ठिकाणी आपल्याला स्पष्टपणे अन्याय होताना दिसतो, तेव्हा जो प्रकोप होतो तो योग्यच आहे ना?

**दादाश्री :** असे आहे की, हा क्रोध आणि चीड, हा तर कमकुवतपणा आहे, केवळ कमकुवतपणा आहे. जगात सर्वांमध्ये हा कमकुवतपणा असतो. कोणी तुला धमकावले, तर तू संतापतोस ना?

**प्रश्नकर्ता :** हो, संतापतो.

**दादाश्री :** तो कमकुवतपणा म्हणायचा की बहादुरी म्हणायची?

**प्रश्नकर्ता :** पण कुठे तरी क्रोध करावाच लागतो ना?

**दादाश्री :** नाही, नाही. क्रोध स्वतःच एक कमकुवतपणा आहे. कुठेतरी क्रोध करावा लागतो ही तर संसारी गोष्ट आहे. हे लोक स्वतःचा क्रोध बंद करू शकत नाहीत म्हणून असे बोलतात की क्रोध केलाच पाहिजे.

## मनोभाव देखील बिघडत नाहीत, तो बलवान

**प्रश्नकर्ता :** माझा कोणी अपमान केला आणि मी गप्प बसलो, तर तो कमकुवतपणा नाही का म्हणायचा?

**दादाश्री :** नाही, ओहोहो! अपमान सहन करणे, ही तर मोठी बहादुरीच म्हणायाची! आता आम्हाला (दादाजींना) कोणी शिव्या दिल्या, तर आम्हाला काहीच होत नाही. त्याच्या प्रति मनोभाव पण बिघडत नाहीत, हीच तर बहादुरी! आणि कमकुवतपणा तर, हे सर्व नेहमी किटकिट करत राहतात, जीवमात्र भांडण-तंटे करत राहतात, ती तो कमकुवतपणा म्हटला जातो. अपमान शांतपणे सहन करणे ही तर मोठी बहादुरी आहे. आणि असा अपमान एकदाच सहन केला, एक पाऊल ओलांडले, तर शंभर पाऊले ओलांडण्याची शक्ती प्राप्त होते. हे तुम्हाला समजले का? समोरची व्यक्ती बलवान असेल तर त्याच्या समोर सर्वच निर्बल होऊन जातात. हा तर त्याचा स्वाभाविक गुण आहे. परंतु जर निर्बल माणसाने आपल्याला छेडले, तरी पण आपण त्याला काहीच केले नाही, तर ती बहादुरी म्हणायची.

खरे तर, निर्बलाचे रक्षण करायला हवे आणि बलवानाचा सामना करायला हवा, पण या कलियुगात अशी माणसेच उरली नाहीत ना! सध्या तर निर्बल व्यक्तीलाच छळत राहतात आणि बलवानापासून दूर

पळतात. फार कमी माणसे अशी आहेत जी निर्बलाचे रक्षण करतात आणि बलवानाचा प्रतिकार करतात. असे असेल तर तो क्षत्रियगुण म्हणायचा. बाकी तर, जगात सर्वच निर्बल व्यक्तीला छळत राहतात. घरी जाऊन नवरा बायकोवर बहादुरी दाखवतो, खुंटीला बांधलेल्या गाईला मारले तर ती कुठे जाणार? आणि मोकळी सोडून मारले तर? पळून जाईल, किंवा सामना करेल.

जो मनुष्य स्वत:ची शक्ती असूनही समोरच्याला छळत नाही स्वत:च्या शत्रूलाही छळत नाही, ती बहादुरी म्हणायची. आता जर कोणी तुमच्यावर क्रोध करत असेल आणि तुम्ही सुद्धा त्याच्यावर क्रोध केला, तर त्याला भित्रेपणा नाही का म्हणायचा? माझे काय म्हणणे आहे की, हे क्रोध-मान-माया-लोभ या सर्व निर्बलता आहेत. जो बलवान आहे, त्याला क्रोध करायची गरजच कुठे आहे? पण हा तर क्रोधाचा जो ताप आहे, त्या तापाने समोरच्याला वश करायला जातो, पण ज्याला क्रोध येत नाही, त्याच्याजवळ दुसरे काही तरी असेलच ना? त्याच्या जवळ 'शील' नावाचे जे चारित्र्य आहे, त्याने जनावरे सुद्धा वश होतात, वाघ, सिंह, शत्रु, सर्वच वश होतात!

## क्रोधी म्हणजेच अबला

**प्रश्नकर्ता :** पण दादाजी, जर कधी एखादी व्यक्ती आपल्यावर तापली, चिडली तर काय करायचे?

**दादाश्री :** तापणारच ना, त्याच्या ताब्यात थोडीच आहे? आतील मशिनरीवर त्याचा अंकुश नाही ना ! हे तर जसे-तसे करून आतील मशिनरी चालत असते. स्वत:च्या ताब्यात असेल तर मशिनरी गरम होऊच देणार नाही ना! थोडेसे पण गरम होणे म्हणजे गाढव होणे, मनुष्य असून गाढव होणे. पण असे तर कोणी करणारच नाही ना! जिथे आपला अंकुशच नाही तिथे काय होऊ शकते?

असे आहे, या संसारात कधीही तापण्याचे (चिडण्याचे) काही कारणच नाही. कोणी म्हणेल, 'हा मुलगा माझे म्हणणे ऐकत नाही.' तरीपण तिथे तापण्याचे काही कारणच नाही. तिथे तुला थंड राहून काम घेतले पाहिजे. हे तर तू कमकुवत आहेस म्हणून तापतोस. तापणे हा तर प्रचंड कमकुवतपणा म्हणायचा. अतिशय कमकुवत असल्यामुळेच तापतो ना! म्हणून जो तापतो त्याच्यावर दया केली पाहिजे की ह्या बिचाऱ्याचा क्रोधावर बिलकुल कंट्रोल नाही. ज्याला स्वत:चा स्वभावही कंट्रोलमध्ये नाही, त्याच्यावर दया केली पाहिजे.

तापणे म्हणजे काय? तर प्रथम स्वत: जळायचे आणि नंतर समोरच्याला जाळायचे. ही आगकाडी लावणे म्हणजे स्वत: भडभड जळायचे आणि मग समोरच्यालाही जाळून टाकायचे. तापणे हे जर आपल्या हातात असते तर कोणी तापलेच नसते ना! जळायला कोणाला आवडेल? कोणी असे म्हणेल की, 'संसारात कधी कधी क्रोध करणे जरूरी आहे.' तेव्हा मी सांगेन, 'नाही, असे काहीच कारण नाही की, जिथे क्रोध करणे गरजेचे आहे.' क्रोध हा कमकुवतपणा आहे, म्हणून क्रोध होऊन जातो. म्हणूनच भगवंताने क्रोधीला अबला (स्त्री) म्हटले आहे. पुरुष कोणाला म्हणायचे? क्रोध-मान-माया-लोभ हा कमकुवतपणा ज्याच्यात नाही, त्याला भगवंताने 'पुरुष' म्हटले आहे. हे जे पुरुष दिसतात, त्यांना 'अबला' म्हटले आहे, पण त्यांना लाज वाटत नाही ना? तेवढे बरे आहे, नाही तर 'अबला' म्हटल्यावर लाजले असते! पण त्यांना काही भानच नाही. भान किती आहे? अंघोळीसाठी पाणी ठेवले तर अंघोळ करायची. खायचे, अंघोळ करायची, झोपायचे या सगळ्यांचे भान आहे, पण दुसरे कोणते भान नाही. मनुष्यत्वाचे जे विशेषभान म्हणतात की, हा 'सज्जन पुरुष' आहे, अशी सज्जनता लोकांच्या नजरेत यावी याचे भान नाही.

क्रोध-मान-माया-लोभ हा तर उघड कमकुवतपणा आहे आणि जास्त क्रोध आल्यावर हात पाय थरथरतात ते तुम्ही पाहिले नाही का?

**प्रश्नकर्ता :** शरीर पण नकार देते की तुला क्रोध करण्यासारखे नाही.

**दादाश्री :** हो, शरीर पण नकार देते की हा क्रोध करणे आपल्याला शोभत नाही. म्हणजे क्रोधाला तर फार मोठा कमकुवतपणा म्हणतात! म्हणून क्रोध करणे हे आपल्यासाठी उचित नाही.

## प्रभाव पडतो, कमकुवतपणा नसल्यावर

**प्रश्नकर्ता :** जर एखादा माणूस लहान मुलाला मारत असेल आणि त्याचवेळी आपण तिथून जात असू, तर त्याला असे करण्यास मनाई करतो, पण तरीही त्याने ऐकले नाही तर शेवटी रागावून किंवा क्रोध करून त्याला थांबवायचे की नाही?

**दादाश्री :** तुम्ही क्रोध केला तरी पण तो मारल्याशिवाय राहणार नाही. अरे, तो तुम्हालासुद्धा मारेल! मग त्याच्यावर क्रोध का करायचा? त्याला हळूवारपणे सांगा, व्यावहारिक गोष्टी करा, परंतु त्याच्यावर क्रोध करणे ही तर वीकनेस आहे.

**प्रश्नकर्ता :** तर मुलाला मारू द्यायचे?

**दादाश्री :** नाही, तिथे जाऊन आपण सांगावे, अहो भाऊ, आपण असे का करता? या मुलाने आपले काय बिघडवले आहे? असे त्याला समजावून सांगू शकता. त्याच्यावर क्रोध करणे, हा तुमचा कमकुवतपणाच आहे. प्रथम तर आपल्यात कमकुवतपणा नसावा ज्याच्यात कमकुवतपणा नसतो त्याचाच प्रभाव पडतो! त्याने सहज जरी सांगितले तरी पण सगळे त्याचे ऐकतात.

**प्रश्नकर्ता :** कदाचित ऐकणारही नाहीत.

**दादाश्री :** नाही ऐकायचे काय कारण आहे? तर आपली पर्सनॉलिटी (प्रभाव) पडत नाही. म्हणजे कमकुवत असता कामा नये.

चारित्र्यवान असले पाहिजे. 'मेन ऑफ पर्सनॉलिटी' असले पाहिजे. लाखो गुंडे त्याला पाहताच पळून जातात! चिडचिड्या माणसापासून कोणी पळून तर जात नाही, उलट त्याला मारतील! लोक तर कमकुवत माणसालाच मारतात ना!

अर्थात मेन ऑफ पर्सनॉलिटी असले पाहिजे. पर्सनॉलिटी कधी येते? विज्ञान जाणल्यावर पर्सनॉलिटी येते. या जगात जे विसरले जाते ते रिलेटिव्ह ज्ञान आहे, आणि ज्याला कधीही विसरता येत नाही ते विज्ञान आहे.

## उष्णतेपेक्षा हिम भारी

हिमवर्षा होते ते तुम्हाला माहीत आहे का? आता हिम म्हणजे तर अति थंड असते ना? त्या हिमाने झाडे जळतात, कापूस, गवत सगळे जळून जाते. हे तुला माहीत आहे की ते थंडीत का जळूनजातात?

**प्रश्नकर्ता :** 'ओवरलिमिट' (अति) थंडीमुळे.

**दादाश्री :** हो, जर तू थंड होऊन राहशील तर असे 'शील' उत्पन्न होईल.

## क्रोध बंद तिथे प्रताप

**प्रश्नकर्ता :** पण दादाजी, गरजेपेक्षा जास्त थंड होणे, ही सुद्धा एक कमकुवतपणाच आहे ना?

**दादाश्री :** गरजेपेक्षा जास्त थंड व्हायची गरजच नाही. आपल्याला लिमिटमध्ये राहायचे आहे, त्याला 'नॉर्मालिटी' म्हणतात. बिलो नॉर्मल इज द फिवर, अबॉव्ह नॉर्मल इज द फीवर, नाईन्टी एट इझ द नॉर्मल. तात्पर्य आपल्याला नॉर्मालिटीच हवी.

क्रोधी माणसापेक्षा, क्रोध न करणाऱ्याला लोक जास्त घाबरतात,

याचे बरे काय कारण असेल? क्रोध बंद झाल्यावर प्रताप उत्पन्न होतो, असा निसर्गाचा नियम आहे! नाही तर त्याला रक्षण करणारेच मिळणार नाहीत ना! क्रोध हे तर रक्षण होते. अज्ञानतेत क्रोधाने रक्षण होत होते.

## चिडचिड्याचा नंबर शेवटचा

**प्रश्नकर्ता :** सात्विक चीड किंवा सात्विक क्रोध चांगला आहे की नाही?

**दादाश्री :** त्याला लोक काय म्हणतील? ही मुले पण त्यांना म्हणतील, 'हे तर चिडचिडेच आहेत!' चिडणे हा मूर्खपणा आहे, फूलिशनेस आहे. चिडणे हा कमकुवतपणा आहे. मुलांना आपण विचारले की, तुमचे पप्पा कसे आहेत? तर तेही सांगतील, 'ते तर खूपच चिडचिडे आहेत!' बोला, आता अब्रू वाढली की कमी झाली? हा कमकुवतपणा नसावा. जिथे सात्विकता असते तिथे कमकुवतपणा नसतो.

घरातील लहान मुलांना विचारले की, 'तुमच्या घरात पहिला नंबर कोणाचा?' तेव्हा मुले शोधून काढतील की माझी आई कधी चिडत नाही, म्हणून सगळ्यात चांगली तीच आहे. पहिला नंबर तिचा, मग दुसरा, तिसरा, करत करत पापाचा नंबर शेवटी येतो!!! असे का? कारण ते चिडतात, चिडचिडे आहेत म्हणून. मी विचारतो 'पप्पा पैसे आणून तुमच्यासाठी खर्च करतात, तरीसुद्धा त्यांचा शेवटचा नंबर?' तेव्हा ते 'हो' म्हणतात. बोला आता, मेहनत मजुरी करून खायला द्या, पैसे आणून द्या, तरीपण शेवटचा नंबर आपलाच येतो ना?

## क्रोध म्हणजे आंधळेपण

**प्रश्नकर्ता :** सामान्य रूपाने मनुष्याला क्रोध येण्याचे मुख्य कारण काय असू शकते?

**दादाश्री :** दिसणे बंद होते म्हणून! मनुष्य भिंतीला कधी

आपटणार? जेव्हा त्याला भिंत दिसत नाही तेव्हाच आपटणार ना? तसेच आतून दिसणे बंद झाल्यामुळे मनुष्य क्रोधित होतो. पुढचा रस्ता सापडत नसल्यामुळे क्रोध येतो.

## सुचत नाही तेव्हा क्रोध

क्रोध केव्हा येतो? तर जेव्हा दर्शन थांबते तेव्हा ज्ञान थांबते, त्यामुळे क्रोध उत्पन्न होतो. मान सुद्धा असाच आहे. दर्शन थांबते, म्हणून ज्ञान थांबते, म्हणून मान उत्पन्न होतो.

**प्रश्नकर्ता :** उदाहरण देऊन समजावले तर अधिक स्पष्ट होईल.

**दादाश्री :** आपले लोक म्हणतात ना की, 'का एवढे रागावलात' तेव्हा सांगतात, 'मला काही सुचत नव्हते म्हणून मी रागावलो.' हो, जेव्हा काही सुचेनासे होते तेव्हा मनुष्य रागवतो. सुचत असेल तर तो रागवेल का? राग येतो, तेव्हा हा राग पहिले बक्षिस कोणाला देतो? तर ज्याला राग आला आहे त्याला आधी जाळतो नंतर दुसऱ्यांना जाळतो.

## क्रोधाग्नी जाळतो स्वतःला आणि इतरांना!

क्रोध म्हणजे स्वतः आपल्या घराला आग लावणे. स्वतःच्या घरात गवत भरलेले असेल आणि त्यास काडी लावणे, याला म्हणतात क्रोध. म्हणजे पहिले स्वतः जळतो आणि नंतर शेजाऱ्यांना जाळतो.

गवताच्या मोठ मोठ्या पेंढ्या एखाद्याच्या शेतात जमा करून ठेवलेल्या असतील पण त्यावर एकच काडी टाकली तर काय होईल?

**प्रश्नकर्ता :** जळून जातील.

**दादाश्री :** तसेच एकदा क्रोध केल्याने, दोन वर्षाची जी कमाई (साधना) केलेली असेल ती मातीत मिळते. क्रोध म्हणजे प्रकट अग्नी. त्याला स्वतःला ही कळत नाही की, मी सर्व धूळघाण केली. कारण

बाहेरच्या गोष्टी कमी होत नाही, पण आतील सर्व संपते. पुढच्या जन्मासाठीची जेवढी तयारी केली असेल, त्यातील थोडे (पुण्य) खर्च होऊन जाते. पण मग जास्त खर्च झाल्यावर काय होणार? इथे मनुष्य होता तेव्हा अन्न खात होता, मग तिथे चारा खायला (जनावरांमध्ये) जायला लागेल. अन्न सोडून चारा खायला जावे लागते, हे काय चांगले म्हणायचे?

जगात कोणताही मनुष्य क्रोधाला जिंकू शकत नाही. क्रोधाची दोन रूपे आहेत, एक *कढापाच्या* रूपात (बाहेरून दिसणारा क्रोध) आणि दुसरे, *अजंपा* (बेचैनीच्या रूपात) जे लोक क्रोधाला जिंकतात ते कढापा रूपाला जिंकतात. इथे होते असे की एकाला दाबले तर दुसरे वाढणार, आणि जर तो म्हणाला की मी क्रोधाला जिंकले, तर परिणामस्वरूप त्याचा मान वाढेल. वास्तवात क्रोध पूर्णपणे जिंकता येत नाही. हे तर बाहेरून दिसणाऱ्या-दृश्य क्रोधालाच जिंकले असे म्हटले जाईल.

## तंत म्हणजेच क्रोध

ज्या क्रोधात तंत आहे, त्यालाच क्रोध म्हणतात. उदाहरणार्थ, पति-पत्नी रात्री खूप भांडले, क्रोध जबरदस्त उफाळून आला. रात्रभर दोघेही जागे राहिले. सकाळी बायकोने चहाचा कप जरा आपटूनच ठेवला, तर पति समजून जातो की अजून तंत (क्रोधाची पकड) आहे! त्याचेच नाव क्रोध. मग तो तंत कितीही वेळेचा असू दे! अरे, काहींना तर आयुष्यभराचा असतो! बाप मुलाचे तोंड पाहत नाही आणि मुलगा बापाचे तोंड पाहत नाही! क्रोधाचा तंत तर बिघडलेल्या चेहऱ्यावरून लगेच कळतो.

तंताचे असे आहे की पंधरा वर्षांपूर्वी कोणी तुमचा अपमान केला असेल आणि ती व्यक्ती पंधरा वर्षांपर्यंत तुम्हाला भेटली नव्हती. पण आज ती व्यक्ती भेटली, तर भेटल्यावर लगेच तुम्हाला सर्वकाही आठवते,

हा तंत. तंत कोणाचाही जात नाही. मोठमोठे साधू महाराज पण तंतवाले असतात. रात्री जर आपण काही खोड काढली, तर पंधरा पंधरा दिवस आपल्याशी बोलत नाहीत, ते तंत!

## फरक, क्रोध आणि रागात

**प्रश्नकर्ता :** दादाजी, राग (गुस्सा) आणि क्रोध यात फरक कायआहे?

**दादाश्री :** क्रोध त्यास म्हणतात की, जो अहंकारासहित असेल. राग आणि अहंकार दोन्हीही एकत्र झाले तर क्रोध म्हणतात. बाप मुलावर रागावला तर, त्यास क्रोध म्हणत नाही. त्या क्रोधात अहंकार नसतो, म्हणून त्याला राग म्हणतात. भगवंत म्हणाले 'हा रागावला तरी त्याच्या खाती पुण्य जमा करा.' तेव्हा कोणी म्हणतो, 'राग केला तरी?' त्यावर भगवंत म्हणाले, 'क्रोध केला तर पाप आहे, रागावण्यात पाप नाही' क्रोधात अहंकार मिसळलेला असतो. तुम्हाला जेव्हा राग येतो तेव्हा तुम्हाला आतमध्ये वाईट वाटते ना?

क्रोध-मान-माया-लोभ दोन प्रकारचे असतात.

एक प्रकारचा क्रोध की जो वळवला जाऊ शकतो असा-निवार्य. कोणावर क्रोधआला तर त्याला आतल्या आत वळवून घेता येते, आणि त्या क्रोधाला शांत करता येते, असा वळू शकणारा क्रोध. या स्टेजपर्यंत पोहोचलो तर व्यवहार खूपच सुंदर होईल!

दुसऱ्या प्रकारचा क्रोध ज्याला वळवता येत नाही, असा-अनिवार्य. खूप प्रयत्न केल्यावरही फटाका फुटल्याशिवाय राहतच नाही. तो म्हणजे वळवता न येणारा अनिवार्य क्रोध. हा क्रोध स्वत:चे अहित करतो आणि समोरच्याचेसुद्धा अहित करतो.

भगवंताने कुठपर्यंतचा क्रोध चालवून घेतला आहे साधू आणि

चारित्र्यवाल्यांसाठी? तर असा क्रोध जो समोरच्या व्यक्तीला दु:खदायी होत नाही, तेवढ्या क्रोधाला भगवंतानी चालवून घेतले आहे. माझा क्रोध फक्त मलाच दु:ख देतो, पण दुसऱ्या कोणाला दु:ख देत नाही, तेवढा क्रोध चालवून घेतला आहे.

## जाणणाऱ्याला ओळखा

**प्रश्नकर्ता :** आपण सगळेच जाणतो की, हा क्रोध होतो, हे वाईट आहे. तरी पण...

**दादाश्री :** असे आहे ना, जो क्रोधी आहे तो जाणत नाही, लोभी आहे तो जाणत नाही, मानी आहे तो जाणत नाही. जाणणारा तर वेगळाच आहे. आणि या सगळ्या लोकांच्या मनात येते की, हे सर्व तर मी जाणतो तरी पण असे का होत आहे? पण 'जाणतो' तो कोण? ते तर माहीतच नाही. 'कोण जाणतो' हे माहीत नाही, तेच तर शोधायचे आहे. 'जाणणाऱ्याला' शोधून काढले तर हे सर्व दोष संपून जातील असे आहे. पण जाणतच नाही ना! जाणले असे तेव्हाच म्हणतात की (तो दोष) निघूनच जातो, उभा राहतच नाही.

## सम्यक् उपाय, जाणून घ्या एक वेळा

**प्रश्नकर्ता :** हे जाणल्यानंतरही क्रोध येतो, त्यावर काय उपाय?

**दादाश्री :** कोण जाणतो? जाणल्यानंतर क्रोध येणारच नाही. क्रोध होतो म्हणजे जाणतच नाहीत, फक्त अहंकार करतात की 'मी जाणतो.'

**प्रश्नकर्ता :** क्रोध केल्यानंतर मनात येते की आपण क्रोध करायला नको होता.

**दादाश्री :** नाही, पण जाणल्यानंतर क्रोध येत नाही. आपण येथे दोन बाटल्या ठेवल्या असतील आणि कोणी समजावले की या एका

बाटलीत औषध आहे आणि दुसऱ्या बाटलीत पोईजन (विष) आहे. दोन्ही बाटल्या सारख्याच दिसतात, पण त्यात जर चूकभूल झाली तर कळते ना की हा जाणतच नाही? चूक झाली नाही तर मात्र म्हणू की तो जाणत आहे, पण चूक तर होत आहे, म्हणून हे निश्चित झाले की तो जाणत नव्हता. त्याच प्रमाणे क्रोध येतो, याचा अर्थ तुम्ही जाणत नाही, फक्त जाणल्याचा अहंकार घेऊन फिरत आहात. उजेडात कधी ठोकर लागते का? आणि जोपर्यंत ठोकर लागत आहे तोपर्यंत जाणलेच नाही. हे तर आपण अंधारालाच उजेड म्हणतो, तीच आपली चूक आहे. म्हणून सत्संगामध्ये बसून एकदा 'जाणा', त्यानंतर मग क्रोध-मान-माया-लोभ सर्वच निघूनजातील.

**प्रश्नकर्ता :** पण क्रोध तर सगळ्यांनाच येतो ना?

**दादाश्री :** या भाऊंना विचारा, हे तर नाही म्हणतात.

**प्रश्नकर्ता :** सत्संगात आल्यानंतर क्रोध येत नाही ना!

**दादाश्री :** अस्सं? मग यांनी कुठले औषध घेतले असेल? द्वेषाचे मूळच नष्ट होऊन जाईल, असे औषध धेतले!

## समजदारीने

**प्रश्नकर्ता :** माझा कोणी जवळचा नातेवाईक असेल त्याच्यावर मी क्रोधित झालो. तो त्याच्या दृष्टीने कदाचित बरोबरही असेल, पण मी माझ्या दृष्टीने क्रोधित झालो, तर कोणत्या कारणाने मी क्रोधित होतो?

**दादाश्री :** तुम्ही इथे येत असताना ह्या इमारती वरून एक दगड तुमच्या डोक्यावर येऊन पडला आणि रक्त आले, तर तेव्हा क्रोध कराल?

**प्रश्नकर्ता :** नाही, हे तर 'हॅपन' (नैसर्गिक रीत्या) झाले.

**दादाश्री :** नाही, पण तेव्हा तुम्ही क्रोध का करत नाही? कारण तुम्ही कोणाला पाहिले नाही, म्हणून क्रोध कसा येईल?

**प्रश्नकर्ता :** कोणी जाणूनबुजून मारलेले नाही.

**दादाश्री :** आणि, आता बाहेर गेल्यावर एखाद्या मुलाने दगड मारला आणि तो तुम्हाला लागला आणि रक्त आले, तेव्हा तुम्ही त्याच्यावर क्रोध करता. कशासाठी? त्याने मला दगड मारला, म्हणून रक्त आले आणि म्हणून क्रोध करता की तू का मारलेस? डोंगरावरून दगड घरंगळत आला आणि डोक्यावर लागला, रक्त निघाले, तर तेव्हा तो पाहतो, पण क्रोध करत नाही!

त्याला असेच वाटते की तोच करत आहे. कोणी जाणूनबुजून मारूच शकत नाही. डोंगरावरून दगड घरंगळणे आणि ह्या मनुष्यांनी दगड मारणे, ह्या दोन्ही गोष्टी सारख्याच आहेत. पण भ्रांतिमुळे असे दिसते की हा मारत आहे. या जगात कुठल्याही मनुष्याला संडास जाण्याचीही शक्ती नाही.

आपल्याला हे समजले की कोणी जाणूनबुजून मारले नाही, तर तिथे क्रोध करत नाही. मग सांगतो, 'मला क्रोध येतो. माझा स्वभाव क्रोधी आहे.' अरे, स्वभावामुळे क्रोध येत नाही. मग त्या पोलिसांच्यासमोर क्रोध का येत नाही? पोलिस खडसावतो तेव्हा पोलिसावर क्रोध का येत नाही? त्याला पत्नीचा राग येतो, मुलांवर क्रोध येतो, शेजाऱ्यांवर, अंडरहॅन्ड (नोकर वगैरे) वर क्रोध येतो आणि 'बॉस' (साहेब) वर का येत नाही? म्हणजेच स्वभावामुळे मनुष्याला क्रोध येत नाही. परंतु त्याला तर स्वत:ची मनमानी करायची असते.

**प्रश्नकर्ता :** क्रोधाला कंट्रोल कसे करायचे?

**दादाश्री :** समजुतीने. तुमच्या समोर जे येत असते ते तर निमित्त आहे आणि ते तुमच्याच कर्मांचे फळ देत आहे. म्हणजे तो निमित्त बनला आहे. जर असे समजले, तर क्रोध कंट्रोलमध्ये येईल. जेव्हा तुम्ही दगड डोंगरावरून पडला असे बघता, तेव्हा क्रोधावर कंट्रोल करू शकता. तर यातसुद्धा असेच समजायचे की हे सर्व डोंगरासारखेच आहे.

रस्त्यात कोणी गाडीवाला चुकीच्या मार्गाने आपल्या समोर येत असेल तर तिथे भांडत नाही ना? क्रोध करत नाही ना? का? आपण त्याला धडक मारून तोडून टाकायचे, असे करतो का कोणी? नाही. मग तिथे का करत नाही? तिथे शहाणपणा करता की मी मरून जाईन. अहो, मग त्याहून जास्त तर क्रोध केल्यामुळे मरत आहात. पण हे चित्र दिसत नाही आणि ते चित्र उघड्या डोळ्यांनी दिसते, इतकाच फरक आहे! तिथे रोड वर सामना करत नाही? क्रोध करत नाही, समोरच्याची चूक झाली तरी पण?

**प्रश्नकर्ता :** नाही.

**दादाश्री :** असेच सर्व जीवनातही समजून घेण्याची गरज आहे.

## परिणाम तर कारणे बदलल्यावरच बदलतील

एक भाऊ मला म्हणतो की, 'अनंत जन्मांपासून हा क्रोध काढत आलो आहोत, पण तो जात का नाही?' त्यावर मी सांगितले 'क्रोध काढून टाकण्याचे उपाय तुम्ही जाणत नसाल.' तो म्हणाला, 'क्रोध बंद करण्याचे उपाय तर शास्त्रात लिहिलेले आहेत, ते सगळे आम्ही करतो, तरी हा क्रोध जात नाही.' तेव्हा मी सांगितले, 'सम्यक् उपाय असला पाहिजे.' तेव्हा म्हणाला, 'सम्यक् उपाय तर खूप वाचले, पण त्यांचा काही उपयोग होत नाही.' मग मी त्याला सांगितले, 'क्रोध बंद करण्यासाठी उपाय शोधणे हा मूर्खपणा आहे, कारण क्रोध हा परिणाम आहे. जसे तुम्ही परीक्षा दिली होती आणि त्याचा रिझल्ट (परिणाम) आला. आणि आता तुम्ही आलेल्या रिझल्टला नष्ट करण्याचा उपाय करता, असा हा प्रकार झाला. परंतु रिझल्ट हा आला, तो कशाचा परिणाम आहे, ते समजून त्यात आपल्याला फेरबदल करण्याची गरज आहे.'

लोक काय म्हणतात, 'क्रोधाला दाबून टाका, क्रोधाला काढून टाका.' अहो! असे का करता? विनाकारण डोके खराब करता! आणि

तरी पण क्रोध तर निघतच नाही. पण तेव्हा ते म्हणतात, 'नाही साहेब, थोडा-फार तर दाबला गेला आहे.' अरे, जोपर्यंत आत क्रोध आहे, तोपर्यंत तो दाबला गेला असे म्हणता येणार नाही. तेव्हा त्या भाऊने विचारले, 'मग आपल्याकडे दुसरा काही उपाय आहे का?' मी सांगितले, 'हो, उपाय आहे, तुम्ही करणार?' तर म्हणे हो. तेव्हा मी त्यांना सांगितले, 'एक तर अशी नोंद करा की या जगात मुख्य करून कोणावर क्रोध येतो?' जिथे जिथे क्रोध येतो, त्याची नोंद करा आणि जिथे क्रोध येत नाही तेही जाणून घ्या. एकदा लिस्ट तयार करा की ह्या व्यक्तीवर क्रोध येत नाही. काही लोकांनी जरी कितीही वाईट केले, तरी त्यांच्यावर क्रोध येत नाही, आणि काही बिचारे अगदी सरळ वागतात, तरी पण त्यांच्यावर क्रोध येतो. म्हणजे याचे काही कारण तर असेलच ना?

**प्रश्नकर्ता :** त्या व्यक्तीसाठी मनात ग्रंथी बांधली गेली असेल?

**दादाश्री :** हो, ग्रंथी बांधली गेली आहे. ती ग्रंथी सोडवण्यासाठी आता काय करायचे? परीक्षा तर आधीच दिली गेली आहे. म्हणून जितक्या वेळी, ज्याच्यावर क्रोध व्हायचा आहे तितक्या वेळी त्याच्यावर क्रोध येणार, आणि त्यासाठी ग्रंथी सुद्धा बांधली गेली आहे, मग आता आपल्याला काय करायला हवे? तर ज्याच्या वर क्रोध येत असेल त्याच्यासाठी आपले मनोभाव बिघडवायचे नाहीत. मनोभाव सुधारा, की जाणा, आपल्या प्रारब्धानुसार हा मनुष्य असे करतो आहे. तो जे जे काही करतो तो आपल्याच कर्मांचा उदय आहे, म्हणून तो असे करत आहे. अशा प्रकारे आपण आपले मनोभाव सुधारायचे. अशा प्रकारे सतत मनोभाव सुधारत राहिल्याने समोरच्यासाठी आपले मन सुधारेल, तेव्हा मग त्याच्यावर क्रोध होणे बंद होईल. काही काळापर्यंत मागचा जो इफेक्ट (परिणाम) आहे, तेवढा इफेक्ट देऊन मग बंद होईल.

ही जरा सूक्ष्म गोष्ट आहे, आणि ती लोकांना समजलेली नाही. प्रत्येक गोष्टीचा काही उपाय तर असतोच ना? उपायाशिवाय जग

नसतेच! लोक तर परिणामाचाच नाश करू इच्छितात. म्हणजे क्रोध-मान-माया-लोभ, यावर उपाय हा आहे की परिणामाला काहीच करू नका पण त्याच्या कारणांना नष्ट करा तर ते सर्व निघून जातील. म्हणजे तो असा विचारक असावा. अजागृत असेल तर उपाय कसे करणार?

**प्रश्नकर्ता :** कारणांना कशा प्रकारे नष्ट करायचे, हे जरा परत समजवा.

**दादाश्री :** या भाऊवर मला क्रोध होत असेल तर मी निष्कर्ष काढतो की मला याच्यावर जो क्रोध होत आहे, तो तर मी पूर्वी त्याचे दोष बघितले होते, त्याचा परिणाम आहे. आता तो जे जे दोष करील, ते जर मी मनावर घेतले नाहीत, तर मग त्याच्या प्रति जो क्रोध आहे तो बंद होत जाईल. थोडे पूर्वीचे परिणाम असतील तेवढे येतील पण नंतर मग बंद होऊन जातील.

**प्रश्नकर्ता :** दुसऱ्यांचे दोष पाहतो म्हणून क्रोध येतो?

**दादाश्री :** हो. दोष पाहत आहोत, तेही आपण जाणायचे की, हे सुद्धा चुकीचे परिणामच आहेत. जेव्हा हे चुकीचे परिणाम दिसायचे बंद होतील, त्यानंतर क्रोध बंद होईल. आपले दोष बघण्याचे बंद झाले की सगळे बंद होईल.

## क्रोधाच्या मुळात अहंकार

लोक विचारतात, 'आमच्या या क्रोधासाठी काय इलाज करायचा?' मी विचारले, 'आता आपण काय करता?' तेव्हा म्हणतात, 'क्रोध दाबत राहतो.' मी विचारले, 'ओळखून दाबता की न ओळखता? क्रोधाला ओळखायला तर हवे ना?' क्रोध आणि शांती दोन्ही जवळ जवळ बसलेले असतात. तेव्हा जर आपण क्रोधाला ओळखले नाही आणि (चुकून) तर तो शांतीला दाबेल तर उलट शांती मरून जाईल! अर्थात क्रोध दाबून चालणार नाही. तेव्हा त्याला समजले की क्रोध हा तर

अहंकार आहे. तेव्हा आता कोणत्या प्रकारच्या अहंकाराने क्रोध येतो याची सविस्तर चौकशी करायला हवी.

ह्या मुलाने ग्लास फोडल्यावर क्रोध आला, तर तिथे आपला कोणता अहंकार आहे? ग्लास फुटला याचे नुकसान होईल असा अहंकार आहे. नफा-तोट्याचा अहंकार आहे आपला. म्हणून नफा-तोट्याचा अहंकारावर, विचार करून त्याचे निर्मूलन करा. खोट्या अहंकाराला जपून ठेवल्याने क्रोध येत राहतो. खरे तर, क्रोध आहे, लोभ आहे, ह्या सर्व गोष्टींचा मुळाशी अहंकारच आहे.

## क्रोधाचे शमन, कोणत्या समजुतीने?

क्रोध स्वत:च अहंकार आहे. आता याचा शोध घ्यायला हवा की कशा प्रकारे तो अहंकार आहे. तपासणी केल्यावर त्याला समजेल की क्रोध हा अहंकार आहे. हा क्रोध का उत्पन्न झाला? तर ह्या ताईने कप-बशा फोडल्या, म्हणून क्रोध आला.' आता कप-बशा फोडल्या, त्यात आपल्याला काय हरकत आहे? तर म्हणतात, 'आमचे नुकसान झाले.' नुकसान झाले म्हणून काय तिच्यावर रागवायचे? अहंकार करणे, रागावणे, या सर्व गोष्टींचा जर खोलवर विचार केला तर सर्व अहंकार धुतला जाईल असे आहे. आता हा कप फुटला हे निवार्य आहे की अनिवार्य आहे? अनिवार्य संयोग असतात की नाही? शेठ नोकराला ओरडतो, 'कप-बशा का फोडल्या? तुझे हात तुटले होते का? तू असा आहेस, तसा आहेस.' आता जर हे अनिवार्य असेल, तर त्याला रागवायला हवे का? जावयाच्या हातून कप-बशा फुटल्या, तेव्हा तर तिथे एकही शब्द बोलत नाही! कारण तो सुपिरियर ठरतो, तिथे चुप्पी. आणि इन्फिरियर आला तर त्याचा अपमान करतात. हा सगळा इगोइजम (अहंकार) आहे. सुपिरियर असेल तिथे सगळेच गप्प राहतातच ना! ह्या 'दादाजीं'च्या हातून काही फुटले तर कोणाच्याही मनात काही येणार नाही आणि त्या नोकराच्या हातून फुटले तर?

या जगाने न्याय पाहिलाच नाही. अज्ञानतेमुळे असे होत असते. बुद्धीपूर्वक समज असती तरी बरे झाले असते. बुद्धी जर विकसित झाली असेल, समंजस असेल, तर भांडण होणारच नाही. आता भांडण केल्यावर कप-बशा काही परत येणार आहेत का? फक्त संतोष मिळतो, इतकेच ना! आणि मनात क्लेश होतो तो वेगळाच. म्हणजे या व्यापारात एक तर त्या कप-बशा फुटल्या हे नुकसान, दुसरे क्लेश झाला हे नुकसान, आणि तिसरे नोकराशी वैर बांधले गेले हे नुकसान!!! नोकर वैर बांधेल की, 'मी गरीब आहे' म्हणून मला असे बोलतात ना! पण तो काही वैरभाव सोडणार नाही. भगवंतानेही सांगितले आहे की कोणाशी वैर निर्माण करू नका. शक्य असेल तर प्रेम द्या, पण वैर निर्माण करू नका. कारण प्रेम बांधले तर ते प्रेमच वैर उपटून टाकेल. प्रेम वैराला उपटून टाकते. आणि वैराने तर वैरच वाढत राहते, निरंतर वाढतच राहते. वैरामुळेच ही भटकंती आहे! मनुष्य का भटकतात? तीर्थंकर भेटले नव्हते का कधी? तेव्हा म्हणतात, 'तीर्थंकर तर भेटले होते. त्यांची देशना पण ऐकली होती पण काहीही निष्पन्न झाले नाही.'

कोणकोणत्या अडचणी येतात, कुठे कुठे विरोध होतो, त्या जाणून त्या सर्व विरोधांना मिटवून टाक ना! विरोध होतो, ही संकुचित दृष्टी आहे. म्हणून ज्ञानी पुरुष लाँग साइट (दीर्घ दृष्टी) देतात. लाँग साइटच्या आधाराने सर्व काही 'जसे आहे तसे' दिसते.

## मुलांवर राग येतो तेव्हा...

**प्रश्नकर्ता :** घरात मुलांवर क्रोध येतो तेव्हा काय करावे?

**दादाश्री :** योग्य समज नसल्यामुळे क्रोध येतो. आपण त्याला विचारले की, 'तुला खूप मजा आली होती का?' तेव्हा तो म्हणेल, 'मला खूप वाईट वाटले, आत खूप दुःख झाले होते.' त्याला दुःख

होते, तुम्हालाही दु:ख होते! तर मग मुलावर चिडायची गरज काय? आणि चिडल्यामुळे सुधारत असेल तर चिडा. परिणाम चांगला येत असेल तर चिडणे उपयोगाचे, परिणाम चांगला येत नसेल तर चिडण्याला काय अर्थ? क्रोध केल्याने फायदा होत असेल तर करा आणि जर फायदा होत नसेल तर क्रोध न करता असेच चालवून घ्या ना.

**प्रश्नकर्ता :** आम्ही क्रोध केला नाही, तर ती आमचे ऐकणारच नाहीत, खाणारही नाहीत.

**दादाश्री :** क्रोध केल्यानंतर तरी कुठे ऐकतात?

## वीतरागांची सूक्ष्म दृष्टी तर बघा

तरी पण लोक काय म्हणतात, बाप आपल्या मुलांवर इतका क्रोधित झाला आहे, म्हणून हा बाप नालायक आहे. आणि निसर्गात याचा न्याय कसा होत असतो? तर बापाला पुण्य लाभते. हो, कारण त्याने मुलांच्या हितासाठी स्वत:शी संघर्ष केला. मुलाच्या सुखासाठी स्वत:शी संघर्ष केला, म्हणून पुण्य बांधतो. इतर सर्व प्रकारचा क्रोध पापच बांधतो. हा एकच प्रकार असा आहे की, ज्यात मुलाच्या किंवा शिष्याच्या भल्यासाठी क्रोध करतात. स्वत:चे बाजूला ठेवून त्यांच्या सुखासाठी करतात, म्हणून पुण्य बांधतात. तरी पण लोक तर त्याला अपयशच देत राहतात. पण ईश्वराच्या घरी खरा न्याय आहे की नाही? स्वत:च्या मुलावर, मुलीवर क्रोध करतात पण त्यात हिंसकभाव नसतो, बाकी सर्व ठिकाणी हिंसकभाव असतो. तरी पण यात तंत तर असतोच, कारण मुलीला पाहिल्याबरोबर त्यांना आत क्लेश सुरू होतो.

जर क्रोधात हिंसकभाव आणि तंत हे दोन नसतील तर मोक्ष प्राप्त होईल. आणि जर हिंसकभाव नसेल, फक्त तंत असेल तर पुण्य बांधले जाते. किती सूक्ष्मपणे भगवंतांनी शोधून काढले आहे हे!

## क्रोध केला तरी पण पुण्य बांधतात

भगवंतांनी सांगितले आहे, दुसऱ्यांच्या भल्यासाठी क्रोध केला, परमार्थ हेतूसाठी क्रोध केला, तर त्याचे फळ पुण्य मिळते.

आता या क्रमिक मार्गात तर शिष्य सतत घाबरत राहतात, 'आता काही बोलतील, आता काही बोलतील' आणि ते (गुरु) सुद्धा दिवसभर, अगदी सकाळपासून संतापलेलेच असतात. थेट दहाव्या गुणस्थानापर्यंत तीच अवस्था! त्यांनी डोळे लाल केले तर आत आग झरते! किती तरी वेदना होत असतील! याला कसे बरे पुरुन उरायचे? मोक्ष मिळवणे हा काय लाडू खायचा खेळ आहे? कधी तरीच असे अक्रम विज्ञान प्राप्त होत असते.

## क्रोध म्हणजे एक प्रकारचा सिग्नल

जगातील लोक काय म्हणतात, याने मुलावर क्रोध केला म्हणून तो गुन्हेगार आहे आणि त्याने पाप बांधले. भगवंत असे म्हणत नाहीत. भगवंत म्हणतात, 'मुलावर क्रोध केला नाही म्हणून त्याचा बाप गुन्हेगार आहे. म्हणून त्याला शंभर रूपये दंड करा.' तर काय, 'क्रोध करणे हे ठीक आहे का?' तेव्हा म्हणतात, 'नाही, पण आता त्याची गरज होती. जर येथे क्रोध केला नसता, तर मुलगा वाईट मार्गाला वळला असता'.

क्रोध हा एक प्रकारचा लाल सिग्नल आहे, दुसरे काहीच नाही. जर डोळे वटारले नसते, क्रोध केला नसता, तर मुलगा चुकीच्या मार्गावर गेला असता. म्हणून तर बापाने मुलावर क्रोध केला तरी पण भगवंत त्याला शंभर रुपये बक्षिस देतात.

क्रोध हा लाल झेंडा आहे, हे लोकांना माहीतच नाही आणि किती प्रमाणात लाल झेंडा दाखवायचा, किती वेळेसाठी दाखवायचा, हे समजण्याची गरज आहे. आता मेलगाडी जात असेल आणि विना कारण अडीच तास लाल झेंडा घेऊन उभा राहिला तर काय होईल? अर्थात

लाल सिग्नलची गरज आहे, पण तो किती वेळ ठेवावा, हे नीट समजून घेण्याची गरज आहे.

थंड (शांत) राहणे हा हिरवा सिग्नल आहे.

## रौद्रध्यानाचे रूपांतर धर्मध्यानात

मुलावर क्रोध केला पण आतमध्ये आपला भाव काय आहे की, असे व्हायला नको. तुमचा भाव काय आहे?

**प्रश्नकर्ता :** हो, असे व्हायला नको.

**दादाश्री :** म्हणजे हे रौद्रध्यान होते, ते धर्मध्यानात रूपांतरित झाले. क्रोध आला तरी पण धर्मध्यानात परिणमित झाला.

**प्रश्नकर्ता :** असे व्हायला नको होते. हा भाव असल्यामुळे असे झाले का?

**दादाश्री :** त्यामागे हिंसकभाव नाही. तसे तर हिंसकभावा शिवाय क्रोध होतच नाही, पण क्रोधाची एक अशी विशिष्ट स्थिती आहे की जर स्वतःचा मुलगा, स्वतःचा मित्र, स्वतःची बायको, यांच्यावर क्रोध केल्याने पुण्य बांधले जाते. कारण त्यात हे बघितले जाते की क्रोध करण्यामागे त्याचा उद्देश काय आहे?

**प्रश्नकर्ता :** प्रशस्त क्रोध.

**दादाश्री :** आणि तो अप्रशस्त क्रोध, त्यास वाईट म्हणतात.

तर या क्रोधातही एवढा भेद आहे. दुसरे, पैशांसाठी मुलाला ओरडले की, 'तू धंद्यावर नीट लक्ष देत नाहीस, हा क्रोध वेगळ्या प्रकारचा आहे. आणि मुलाला सुधारण्यासाठी, चोरी करत असेल, काही उलट-सुलट काम करत असेल त्यासाठी मुलाला रागावलो,क्रोध केला त्याचे फळ भगवंताने पुण्य सांगितले आहे. भगवंत किती समंजसआहेत!

## क्रोध टाळा असे

**प्रश्नकर्ता :** आपण क्रोध कोणावर करतो? खास करून ऑफिसमध्ये सेक्रेटरीवर क्रोध करत नाही आणि हॉस्पिटलमध्ये नर्सवर करत नाही, पण घरात बायकोवर आपण क्रोध करतो.

**दादाश्री :** म्हणून तर जेव्हा शंभर लोक बसलेले असतील आणि ऐकत असतील, तेव्हा मी सगळ्यांना सांगतो की, ऑफिसमध्ये बॉस (मालक) धमकावत असेल किंवा कोणी ओरडत असेल, त्या सर्वांचा राग हे लोक घरी बायकोवर काढतात. म्हणून मला सांगावे लागते की, अरे वेड्यांनो, बिचाऱ्या बायकोवर का चिडता. विना कारण बायकोला ओरडता. बाहेर जे धमकावतात त्यांच्याशी लढा ना, इथे का लढता?

माझ्या ओळखीचा एक गृहस्थ होता. तो मला नेहमी म्हणे, 'साहेब एकदा तरी माझ्या घरी या.' तो गवंडीकाम करायचा. एक दिवस मी तिथून जात होतो, तेव्हा तो मला भेटला आणि म्हणाला, 'माझ्या घरी चला ना.' तेव्हा मी त्याच्या घरी गेलो. तिथे मी विचारले, 'अरे, या दोन खोल्यात तुला जमते का?' तेव्हा तो म्हणाला, 'मी तर गवंडी आहे ना!' ही तर मी आमच्या काळाची चांगल्या काळाची गोष्ट सांगत आहे. सध्या तर एका खोलीत राहावे लागते, पण चांगल्या काळातही त्या बिचाऱ्याच्या दोनच खोल्या होता. मग मी विचारले, 'अरे मग बायको तुला हैराण करत नाही?' तेव्हा म्हणाला, 'बायकोला क्रोध आला तरी मी क्रोध करत नाही.' मी विचारले, 'असे का?' तो म्हणाला, 'जर ती क्रोध करील आणि मीसुद्धा क्रोध केला, तर या दोन खोल्यात मी कुठे झोपू आणि ती कुठे झोपणार?' ती तिकडे तोंड करून झोपणार आणि मी इकडे तोंड करून झोपणार, अशा परिस्थितीमध्ये तर मला सकाळी चहासुद्धा चांगला मिळणार नाही. तीच मला सुख देणारी आहे. तिच्यामुळेच मी सुखी आहे. मी विचारले, 'बायकोने

कधी क्रोध केला तर?' तेव्हा म्हणतो, 'तिला समजावतो, 'यार जाऊ दे ना! माझी हालत मीच जाणतो' असे तसे करून तिची समजूत काढतो. पण मी तिला खुश ठेवतो. बाहेर मारपीट करून येतो पण घरात तिला मारपीट करत नाही. याउलट आपले लोक तर बाहेर मार खाऊन येतात आणि घरात मारपीट करतात.

हे तर दिवसभर क्रोध करतात. गाई-म्हशी तरी बऱ्या, त्या क्रोध करत नाहीत. जीवनात काही शांती तर हवी ना. कमकुवतपणा असता कामा नये. हा तर वारंवार क्रोधित होतो. तुम्ही गाडीतून आलात ना? मग गाडीने जर सबंध प्रवासात क्रोध केला तर काय होईल?

**प्रश्नकर्ता :** तर इथे येऊच शकणार नाही.

**दादाश्री :** मग तुम्ही क्रोध केला तर, तिची गाडी कशी चालत असेल? तू तर क्रोध करत नाहीस ना?

**प्रश्नकर्ता :** कधी तरी होऊन जातो.

**दादाश्री :** आणि जर दोघांनाही क्रोध होत असेल, तर बाकी कायउरले?

**प्रश्नकर्ता :** पति-पत्नीमध्ये थोडा फार तरी क्रोध असायलाच हवा ना?

**दादाश्री :** नाही, असा काही कायदा नाही. पति-पत्नीमध्ये तर खूप शांती राहायला हवी. जर दु:ख होत असेल तर त्यांना पति-पत्नी म्हणताच येणार नाही. खऱ्या फ्रेन्डशिप(मैत्री)मध्ये दु:ख होत नाही. आणि ही तर सर्वात मोठी फ्रेन्डशिप म्हणायची! इथे क्रोध करू नये. हे तर लोकांनी असे ठसवले आहे. स्वत:ला क्रोध होतो म्हणून ठसवले की कायदा असाच आहे, पति-पत्नीमध्ये तर अजिबात दु:ख नसावे. इतरत्र भले होवो.

## मनमानी केल्याने मार पडणार

**प्रश्नकर्ता :** घरात किंवा बाहेर मित्रांमध्ये सगळीकडे प्रत्येकाची मते भिन्न-भिन्न असतात आणि त्यात आपल्या धारणे (मर्जी) अनुसार झाले नाही तर, आपल्याला क्रोध का येतो? तेव्हा काय करावे?

**दादाश्री :** सर्वच स्वतःच्या मर्जी प्रमाणे करायला लागले, तर काय होईल? असा विचारच का येतो? लगेचच असा विचार आला पाहिजे की, सर्वच स्वतःच्या मर्जी प्रमाणे करू लागले, तर इथली सर्व भांडी तोडून टाकतील एकमेकांसमोर, आणि खायलाही मिळणार नाही. म्हणून स्वतःच्या मतानुसार कधीच करू नये. आपले मतच ठेवू नये. तुम्ही जर तुमचे मत मांडले नाही तर तुम्ही चुकीचे ठरणार नाहीत. ज्याला गरज असेल तो मत ठेवील.

**प्रश्नकर्ता :** आपण कितीही शांत राहिलो पण पतीने क्रोध केला तर आम्ही काय केले पाहिजे?

**दादाश्री :** तो क्रोध करील आणि जर त्याच्याशी भांडायचे असेल, तर तुम्ही सुद्धा क्रोध करायला हवा, अन्यथा नाही! जर फिल्म बंद करायची असेल तर शांत व्हायचे. फिल्म बंद करायची नसेल तर रात्रभर चालू द्यायची, नाही कोण म्हणतो? तुम्हाला आवडते का अशी फिल्म?

**प्रश्नकर्ता :** नाही, अशी फिल्म आवडत नाही.

**दादाश्री :** क्रोध करून काय करायचे? मनुष्य स्वतःहून क्रोध करत नाही, ही तर 'मेकॅनिकल ॲडजस्टमेंट' (डिस्चार्ज होणारी मनुष्य प्रकृती) क्रोध करत असते. म्हणून मग स्वतःला मनात पश्चाताप होतो की, क्रोध केला नसता तर बरे झाले असते.

**प्रश्नकर्ता :** त्याला थंड करण्यासाठी उपाय काय?

**दादाश्री :** ही मशीन गरम झाली असेल आणि ती थंड करायची

असेल तर थोडा वेळ बंद केल्याने आपोआपच थंड होईल आणि जर हात लावला किंवा त्याला छेडले तर आपणच भाजले जाऊ.

**प्रश्नकर्ता :** आम्हा पति-पत्नींमध्ये क्रोध होतो, चढाओढ होते, वाद होतो, सगळेच होते, तर मी काय करू?

**दादाश्री :** क्रोध तू करतेस की तो? क्रोध कोण करतो?

**प्रश्नकर्ता :** तो, आणि मग मी सुद्धा करते.

**दादाश्री :** तर तेव्हा आपण स्वतःच स्वतःला ओरडायचे की, 'तू अशी का वागतेस? आपण केलेले कर्म, ते तर आपल्याला भोगावेच लागणार ना!' पण प्रतिक्रमण केल्यावर सगळे दोष संपून जातील. नाही तर आपणच दिलेले ठोसे, मग आपल्यालाच भोगावे लागतात. पण प्रतिक्रमण केल्यावर जरा थंड पडतात.

## ही तर एक प्रकारे पशुता

**प्रश्नकर्ता :** आपल्याला क्रोध आला आणि शिवी निघाली, तर मग कशा प्रकारे सुधारायचे?

**दादाश्री :** असे आहे की, हा जो क्रोध करतो आणि शिव्या देतो, ते स्वतःवर कंट्रोल नाही म्हणून असे सर्व घडते. कंट्रोल करण्यासाठी आधी थोडे समजून धेतले पाहिजे. जर आपल्यावर कोणी क्रोध केला तर आपल्याला सहन होणार की नाही, याचा विचार केला पाहिजे. आपण कोणावर क्रोध करणार, त्या आधी आपल्यावर कोणी क्रोध केला तर आपल्याला सहन होईल का? चांगले वाटेल का? असा विचार करावा. आपल्याला जे वर्तन चांगले वाटत असेल तसेच वर्तन दुसऱ्यांसोबत करावे.

त्याने जर तुला शिव्या दिल्या आणि तुला त्याचा त्रास होत नसेल, डिप्रेशन येत नसेल, तर तू सुद्धा तसे कर, नाही तर ते बंदच करून टाकायचे. शिव्या तर देऊच नये. ही तर एक प्रकारची पशुताच आहे. अंडरडेव्हलप्ड पीपल, अन्कल्चर्ड (अडाणी, असंस्कृत माणसे)!

## प्रतिक्रमण हाच खरा मोक्षमार्ग

आधी तर दया ठेवा, शांती ठेवा, समता ठेवा, क्षमा ठेवा, असा उपदेश शिकवतात, तेव्हा लोक काय म्हणतात, 'अरे, मला क्रोधच येत असतो आणि तुम्ही म्हणता क्षमा ठेवा, तर मी क्षमा ठेवू तरी कसा?' म्हणून यांना उपदेश कशा प्रकारे द्यायला हवा की, तुम्हाला क्रोध आल्यावर तुम्ही अशा प्रकारे मनात पश्चाताप करा की, माझा असा काय कमकुवतपणा आहे की, माझ्याने क्रोध केला जातो? ही तर माझ्याकडून चूक झाली, अशा प्रकारे पश्चाताप करा आणि जर तुमचे कोणी गुरु असतील तर त्यांची मदत घ्या आणि पुन्हा असा कमकुवतपणा निर्माण होऊ नये यासाठी निश्चय करा. तुम्ही आता क्रोधाचे समर्थन करू नका, उलट क्रोधाचे प्रतिक्रमण करा.

दिवसातून किती अतिक्रमण होतात आणि कोणा कोणा बरोबर होतात याची नोंद करा आणि त्याचवेळी प्रतिक्रमण करा.

प्रतिक्रमण करताना तुम्हाला काय करायला हवे? तुम्हाला राग आला आणि समोरच्या माणसाला दु:ख झाले तर त्याच्या आत्म्याला आठवून त्याची क्षमा मागावी. अर्थात जे झाले त्याची क्षमा मागा आणि पुन्हा तसे करणार नाही, अशी प्रतिज्ञा करा. आणि आलोचना म्हणजे आमच्यापाशी दोष जाहीर करा की, माझ्याकडून हा दोष झाला आहे.

## मनातही माफी मागा

**प्रश्नकर्ता :** दादाजी, पश्चाताप किंवा प्रतिक्रमण करताना कित्येकदा असे होते की, एखादी चूक झाली असेल, कोणावर क्रोध झाला असेल, तर तेव्हा आत दु:ख होते की हे चुकीचे झाले, पण समोरच्याची माफी मागण्याची हिंमत होत नाही.

**दादाश्री :** अशी माफी मागायचीच नाही. नाही तर तो त्याचा

दुरुपयोग करणार. 'हो. आता आली ना वठणीवर?' तर हे सर्व असे आहे. नोबल (खानदान) नाहीत. माफी मागण्यालायक ही माणसे नाहीत. म्हणून त्याच्या शुद्धात्म्याला आठवण करून मनातच माफी मागावी! हजारात कोणी दहा माणसे अशी निघतील की ते आपण माफी मागण्यापूर्वीच नमतील.

## नगद परिणाम, हार्दिक प्रतिक्रमणामुळे

**प्रश्नकर्ता :** कोणावर भयंकर क्रोध केला गेला, मग बोलून झाल्यावर गप्प झालो. नंतर हे जे बोललो त्यासाठी आतमध्ये जीवाची खूप जळजळ होत राहिली तर त्यासाठी एकापेक्षा जास्त प्रतिक्रमण करावे लागतील?

**दादाश्री :** दोन-तीन वेळा हृदयापासून प्रतिक्रमण करा आणि असे एकदम पद्धतशीर झाले की संपले. 'हे दादा भगवान! मला जबरदस्त क्रोध आला, समोरच्याला खूपच दु:ख झाले! त्याची मी माफी मागतो, आपल्या समक्ष मन:पूर्वक माफी मागतो.'

## गुन्हा पण निर्जीव

**प्रश्नकर्ता :** अतिक्रमणाने जी उत्तेजना होत असते, ती प्रतिक्रमणाने शांत होऊन जाते?

**दादाश्री :** हो, शांत होऊन जाते, चिकट फाईल (गाढ हिशोब) असेल तर पाच पाच हजार प्रतिक्रमण करावे लागतात, तेव्हा शांत होते. राग बाहेर आला नाही पण आत व्याकुळता झाली असेल तरीही आपण त्यासाठी प्रतिक्रमण केले नाही, तर तेवढा डाग (दोष) राहतो. प्रतिक्रमण केले की तो स्वच्छ होतो. अतिक्रमण केले म्हणून प्रतिक्रमण करा.

**प्रश्नकर्ता :** कोणावर क्रोध केल्यानंतर लक्षात आले आणि त्याच क्षणी आपण त्यांची क्षमा मागितली, तर त्यास काय म्हणतात?

**दादाश्री :** आता ज्ञान घेतल्यानंतर क्रोध आला आणि मग माफी मागितली, तर काही हरकत नाही, मुक्त झालात! आणि अशी रूबरू माफी मागणे शक्य नसेल तर मनात माफी मागा, तरी चालेल.

**प्रश्नकर्ता :** रूबरू, सगळ्यांच्या देखत?

**दादाश्री :** तसे जमत नसेल तर हरकत नाही, रूबरू माफी मागितली नाही आणि आतून माफी मागितली तरीही चालेल. कारण हा गुन्हा जिवंत नाही, हा 'डिस्चार्ज' आहे. 'डिस्चार्ज' गुन्हा म्हणजे तो जिवंत गुन्हा नाही. म्हणून इतके वाईट फळ देणार नाही.

## प्रतिष्ठा केल्याने उत्पन्न झाले कषाय

हे सर्व तुम्ही चालवीत नाही, क्रोध-मान-माया-लोभ हे कषाय सर्व चालवितात. कषायांचेच राज्य आहे. 'स्वतः कोण आहे' याचे भान झाल्यावर कषाय जातील. क्रोध आल्यावर पश्चाताप होतो, पण भगवंताने सांगितलेले प्रतिक्रमण करता आले नाही, तर काय फायदा? प्रतिक्रमण करता आले तर सुटका होईल.

ही क्रोध-मान-माया-लोभ, यांची सृष्टी कुठपर्यंत उभी राहते? 'मी चंदुलाल (वाचकांनी चंदुलालच्या जागी स्वतःचे नाव समजावे) आहे आणि असाच आहे' असे निश्चित आहे, तोपर्यंत उभी राहते. जोपर्यंत आपली प्रतिष्ठा केलेली आहे की 'मी चंदुलाल आहे', लोकांनी आपली प्रतिष्ठा केली आणि आपण ती मान्य केली की 'मी चंदुलाल आहे,' तोपर्यंत हे क्रोध-मान-माया-लोभ आत राहतील.

स्वतःची प्रतिष्ठा केव्हा समाप्त होईल? तर 'मी शुद्धात्मा आहे' हे भान होईल तेव्हा. अर्थात स्वतःच्या निजस्वरूपात आल्यावर प्रतिष्ठा तुटून जाते. तेव्हा क्रोध-मान-माया-लोभ जातील, त्याशिवाय जाणार नाहीत. त्यांना मारत राहिल्यानेही ते जाणार नाहीत, उलट वाढत राहतील. एकाला मारले तर दुसरा वाढेल आणि दुसऱ्याला मारले तर तिसरा वाढेल.

## क्रोध दुबळा तिथे मान तगडा

एक महाराज मला म्हणतात, मी क्रोधाला दाबून दाबून नष्ट करून टाकले. मी सांगितले, ''त्याच्या परिणामस्वरूप हा 'मान' नावाचा रेडा अधिक तगडा झाला.'' मान तगडा होत राहतो, कारण मायेचीही मुले मरणार अशी नाहीत. त्यांचा उपाय केला तरच जातील. नाही तर जाणाऱ्यातील नाहीत. ती मायेची मुले आहेत. तो मान नावाचा रेडा इतका तगडा झाला. 'मी क्रोधाला दाबले, मी क्रोधाला दाबले' सांगतो, तेव्हा तो (मान) तगडा झाला. त्यापेक्षा चारही समान होते, तेच ठीक होते.

## क्रोध आणि माया रक्षक आहेत

क्रोध आणि माया, हे तर रक्षक आहेत. हे लोभ आणि मानाचे रक्षक आहेत. लोभाचा खरा रक्षक माया आणि मानाचा खरा रक्षक क्रोध. तरी पण मानासाठी थोडीशी माया करतात, कपट करतात. कपट करूनही मान मिळवतात, असे करतात का लोक?

आणि क्रोध करून लोभ करतात. लोभी व्यक्ती क्रोधी नसते आणि जर लोभ्याने क्रोध केला तर समजायचे की त्याला लोभामध्ये काही तरी बाधा आली आहे, म्हणून तो क्रोध करत आहे. नाही तर लोभ्याला तर शिव्या दिल्या तरी तो सांगेल 'ओरडू दे ना त्याला, मला तर माझे पैसे मिळाले ना.' लोभी असे असतात. कारण कपट सर्व रक्षण करेलच ना. कपट म्हणजे माया, आणि क्रोध हा तर रक्षक आहेत.

आपल्या मानावर बाधा आली, आपला मान भंग झाला तर मनुष्य क्रोध करतो.

क्रोध भोळा आहे. भोळा आधी नष्ट होतो. क्रोध म्हणजे दारूगोळा, आणि दारूगोळा असेल, तिथे लश्कर लढणारच. क्रोध गेला तर लश्कर का लढणार? मग तर ऐरे-गैरे सगळेच पळून जातील. कोणी थांबणारच नाही.

## क्रोधाचे स्वरूप

क्रोध म्हणजे उग्र परमाणू. फटाक्याच्या आत दारुगोळा भरलेला असतो. आणि तो फुटल्यावर ज्वाला भडकते. आणि आतील दारु संपल्यावर आपणहूनच फटाका विझून जातो. तसेच या क्रोधाचे आहे. क्रोध हे उग्र परमाणू आहेत, आणि ते जेव्हा 'व्यवस्थित शक्ती'च्या नियमाने फुटतात, तेव्हा चारी बाजूने पेटतात. फक्त उग्रता असेल त्याला आम्ही क्रोध म्हणत नाही. ज्या क्रोधामध्ये तंत (पकड) राहते त्यालाच क्रोध म्हणतात. क्रोध केव्हा म्हटला जातो, तर जेव्हा आत जळजळ चालू असते, जळजळ असल्यामुळे ज्वाला भडकत असतात व त्याचा परिणाम दुसऱ्यांवरही होत असतो, हे क्रोधाचे एक रूप आहे. त्यास *कढापा* म्हणतात. आणि दुसऱ्या रूपात स्वतः एकटाच आतल्या आत जळत राहतो त्याला *'अजंपा'* म्हणतात. परंतु तंत तर दोन्ही रूपात असतो. आणि उग्रता हा तर वेगळाच प्रकार आहे.

## कुढणे, सहन करणे, हा पण क्रोध

क्रोधपूर्वक वाणी निघाली नाही तर समोरच्याला लागत नाही. तोंडाने बोललात त्यालाच क्रोध म्हणतात असे नाही, आत कुढत राहणे हा पण क्रोध आहे. सहन करणे हा तर डबल क्रोध आहे. सहन करणे म्हणजे दाबत राहणे, ती मग एक दिवस स्प्रिंग उडाली की कळते. सहन का करायचे? याचे तर ज्ञानाने समाधान शोधून काढले पाहिजे.

## क्रोधात मोठी हिंसा

बुद्धी इमोशनल असते, ज्ञान मोशन (गती)मध्ये राहते. जशी ट्रेन मोशनमध्ये चालत असते, ती जर इमोशनल झाली तर?

**प्रश्नकर्ता :** ॲक्सिडंट होईल.

**दादाश्री :** अशी वेडीवाकडी होत चालली तर ॲक्सिडंट होईल.

तसेच मनुष्य जेव्हा इमोशनल होतो तेव्हा आत किती तरी जीव मरतात. क्रोध आला की किती तरी छोटे छोटे जीव (शरीरात) मरून जातात आणि वरून तो दावा करतो की, 'मी तर अहिंसा धर्माचे पालन करत आहे. जीव हिंसा तर करतच नाही' अरे, पण क्रोधामुळे तर जीवच जीव मारतोस इमोशनल झाल्यामुळे!

## क्रोधाला जिंकता येईल असे...

द्रव्य म्हणजे बाहेरील व्यवहार, तो बदलत नाही, पण भाव बदलले तरी खूप झाले.

कोणी म्हणेल की मला क्रोध बंद करायचा आहे. तर आजच क्रोध बंद होणार नाही. बंद करण्यासाठी क्रोधाला ओळखायला हवे, की क्रोध काय आहे? का उत्पन्न होतो? त्याचा जन्म कशाच्या आधारावर होतो? त्याची आई कोण? त्याचे वडील कोण? हे सर्व शोधल्यानंतरच क्रोधाला ओळखता येईल.

## सुटलेलाच सोडवेल

तुम्हाला हे सर्व काढायचे आहे का? काय काय काढायचे आहे सांगा? लिस्ट (यादी) बनवून मला द्या. ते सर्व काढून टाकू. तुम्ही क्रोध-मान-माया-लोभाने बांधलेले आहात का?

**प्रश्नकर्ता :** एकदम.

**दादाश्री :** मग बांधलेला मनुष्य स्वतःहून कसा सुटू शकतो? असे चारी बाजूंनी हात-पाय करकचून बांधलेले असतील, तर तो स्वतः कसा मुक्त होऊ शकतो?

**प्रश्नकर्ता :** त्याला कुणाची तरी मदत घ्यावी लागेल.

**दादाश्री :** बांधलेल्याची हेल्प मदत घेता येईल का?

**प्रश्नकर्ता :** नाही. स्वतंत्र असेल त्याचीच मदत घेतली पाहिजे.

**दादाश्री :** आपण कोणाला विचारले की, 'भाऊ, कोणी आहे का इथे सुटलेला? मुक्त झालेला आहे का कोणी? तर आम्हाला मदत करा. अर्थात जो मुक्त झाला असेल तो मुक्त करू शकतो. इतर कोणीही करू शकणार नाही.

## क्रोध-मान-माया-लोभ यांचे खाणे

काही लोक जागृत असतात, ते म्हणतात खरे की क्रोध येतो तो आम्हाला आवडत नाही, तरी पण करावा लागतो. आणि काही जण तर क्रोध करतात आणि म्हणतात, 'क्रोध नाही केला तर आमची गाडी चालणारच नाही, आमची गाडी बंद पडेल.' असेही म्हणतात.

क्रोध-मान-माया-लोभ निरंतर आपलेच चोरून खातात, पण लोकांना हे समजत नाही. या चौघांना जर तीन वर्ष उपाशी ठेवले तर ते पळून जातील. पण ज्या खाण्यावर ते जगतात ते खाद्य कोणते? हे जर जाणले नाही, तर ते कसे उपाशी राहतील? याची समज नसल्यामुळेच त्यांना खुराक मिळतच राहतो. ते जगतात कशावर? आणि ते सुद्धा अनादि काळापासून जगत आले आहेत! म्हणून त्यांना खाद्य पुरवणे बंद करा, असा विचार तर कोणालाही येत नाही आणि सगळे त्यांच्या पाठी लागून त्यांना काढायचा प्रयत्न करतात. पण ते चारीही असेच जाणाऱ्यातले नाहीत. ते तर आत्मा बाहेर निघाल्यावर (मृत्यूनंतर) आतील सगळे झाडून-पुसून मगच निघतात. त्यांना हिंसक मार नको, तर अहिंसक मार पाहिजे.

आचार्य शिष्याला केव्हा खडसावतात? क्रोध होतो तेव्हा. तेव्हा कोणी विचारले, 'महाराज याला का खडसावत आहात? त्यावर महाराज म्हणतात, 'तो तर खडसावण्यायोग्यच आहे' झाले मग, संपले! असे म्हणतात हाच क्रोधाचा खुराक. केलेल्या क्रोधाचे समर्थन करणे, हाच त्याच खुराक.

ह्या क्रोध-मान-माया-लोभ, यांना जर तीन वर्ष खुराक मिळाला

नाही तर ते स्वत:हूनच पळून जातील, आपल्याला सांगावेही लागणार नाही. कारण प्रत्येक गोष्ट आपल्याला खुराकावर जिवंत असते आणि जगातील लोक काय करतात? तर दररोज या क्रोध-मान-माया-लोभाला खुराक देत असतात. रोजच खाऊ घालतात म्हणून ते तगडे होऊन फिरतात.

मुलांना मारतात, खूप क्रोधीत होऊन मारतात, मग बायको म्हणते, 'बिचाऱ्या मुलाला का इतके मारले?' तेव्हा म्हणतात, 'ते तुला समजणार नाही, तो तर मारण्यायोग्यच आहे' यावर क्रोध समजून जातो 'अरे वाह, मला खुराक दिला. म्हणजे त्याला चूक झाली आहे असे तर समजतच नाही आणि मारण्यालायक आहे असा त्याने अभिप्राय दिला आहे. म्हणून तो मला खुराक देतो आहे.' आपण क्रोधाला प्रोत्साहन दिले, क्रोधाला चांगले मानाले, याला खुराक दिले असे म्हणतात. आणि 'क्रोध वाईट आहे' असे समजले तर त्याला खुराक दिला गेला नाही असे म्हटले जाते. क्रोधाचे समर्थन केले, त्याची बाजू घेतली, तर त्याला खुराक मिळाले. त्या खुराकामुळेच तर तो जगत आहे. लोक त्याचा पक्ष घेतात ना!

क्रोध-मान-माया-लोभ कुठल्याही गोष्टीचे आम्ही (दादाजींने) समर्थन केले नाही. कधी क्रोध आला असेल आणि कोणी म्हणाला 'तुम्ही क्रोध का करता?' तेव्हा मी सांगतो, 'क्रोधही फार चुकीची गोष्ट आहे, माझ्या कमकुवतपणामुळे क्रोध झाला. म्हणजेच आम्ही क्रोधाचे समर्थन केले नाही. लोक तर रक्षण करतात.

हे साधू तपकीर ओढत असतील आणि आपण विचारले 'साहेब, तुम्ही तपकीर का ओढता?' तेव्हा जर ते म्हणाले, 'तपकीर ओढायला हरकत नाही,' तर तो (दोष) वाढतो.

हे चारही, क्रोध-मान-माया-लोभ आहेत, यातील एकावर प्रेम जास्त असेल, तर दुसऱ्यावर त्यापेक्षा कमी असेल, अशा प्रकारे ज्याचा पक्ष घेतला जातो त्याची प्रियता अधिक.

## स्थूल कर्म : सूक्ष्म कर्म

स्थूल कर्म म्हणजे काय, हे मी समजावतो, तुला एकदम क्रोध आला, तुला क्रोध करायचा नसेल तरी पण क्रोध होतो, असे कधी घडते की नाही?

**प्रश्नकर्ता :** हो घडते.

**दादाश्री :** तर हा जो क्रोध आला त्याचे फळ इथल्याइथेच, लगेचच मिळते. लोक म्हणतात, 'जाऊ द्या ना त्याला, तो आहेच खूप क्रोधी.' कदाचित कोणी त्याला थोबाडीतसुद्धा मारील. तर असे अपयश किंवा असल्या कुठल्या प्रकारे तरी त्याला येथील फळ मिळून जाते. क्रोध होणे हे स्थूल कर्म आहे. आणि क्रोध झाला त्यामागे आज तुझा भाव काय आहे की, 'क्रोध केलाच पाहिजे.' तर तो मग पुढच्या जन्माचा क्रोधाचा हिशोब आहे. तुझा आजचा भाव आहे की, क्रोध करायला नको. तुझा निश्चय आहे की, मला क्रोध करायचाच नाही, तरी पण क्रोध झालाच तर पुढच्या जन्मासाठी तुझे बंधन राहणार नाही. या स्थूल कर्मात तुला क्रोध आला तर तुला या जन्मात मार खावा लागेल, तरी पण तुला पुढच्या जन्मासाठी बंधन राहणार नाही, कारण सूक्ष्म कर्मात तुझा निश्चय आहे की क्रोध करायचाच नाही. आणि समजा आज एक व्यक्ती कोणावर क्रोध करत नाही, पण तरी मनात म्हणतो, 'या लोकांवर क्रोध केला तरच ते सरळ होतील.' त्यामुळे तो पुढच्या जन्मात क्रोधवाला होईल! अर्थात बाहेर जो क्रोध होतो ते स्थूल कर्म आहे, आणि त्यावेळी आत जो भाव असतो ते सूक्ष्म कर्म आहे. स्थूल कर्माचे बिलकूल बंधन नाही, हे जर समजून घेतले तर. म्हणून हे 'सायन्स' (विज्ञान) मी नव्याच प्रकारे दिले आहे. आतापर्यंत 'स्थूल कर्मामुळे बंधन आहे' असे लोकांना ठाम शिकविले गेले आहे आणि त्यामुळे लोक घाबरत राहतात.

## भेदज्ञानाने सुटतील कषाय

**प्रश्नकर्ता :** चार कषायांना जिंकण्यासाठी एखादी प्राथमिक भूमिका

तयार करणे जरूरी आहे? जर जरूरी आहे तर त्यासाठी काय करायला हवे?

**दादाश्री :** असे आहे ना, जर क्रोध-मान-माया-लोभ, हे चार (कषाय) निघून गेले तर तो भगवंत झाला.

भगवंताने काय सांगितले आहे, तुझा क्रोध असा आहे की, तू तुझ्या सख्ख्या मामावर क्रोध करतो, तर त्याचे मन तुझ्यापासून दुरावते आयुष्यभरासाठी दुरावते. तर तुझा हा क्रोध चुकीचा आहे. तो क्रोध, जो समोरच्या व्यक्तीच्या मनाला वेगळे करतो, वर्ष दोन वर्षांसाठी वेगळे करतो, नंतर परत एक होतात, त्याला- अप्रत्याख्यानी क्रोध म्हणतात. जो मनाला ब्रेकडाउन करतो, त्याला अंतिम कक्षेचा यूजलेस (निरर्थक) क्रोध म्हटले आहे, त्याला अनंतानुबंधी क्रोध म्हटले आहे. आणि लोभ पण असाच, मग मान, ते सर्व इतके बळकट असतात की ते संपल्यानंतरच मनुष्य योग्य मार्गावर येतो आणि गुणस्थान प्राप्त करतो. त्याशिवाय तर गुणस्थानातही येत नाही. क्रोध-मान-माया-लोभ, हे चार अनंतानुबंधी कषाय गेले तरी खूप झाले.

आता जेव्हा 'जिन'कडून ऐकेल तेव्हा ते जातील. 'जिन' म्हणजे आत्मज्ञानी. मग ते कुठल्याही धर्माचे आत्मज्ञानी असू देत. वेदांताचे असू देत, जैनांचा असू देत, पण ते आत्मज्ञानी असले पाहिजेत. त्यांच्याकडून ऐकले तर श्रावक होईल. आणि श्रावक झाला की त्याचे अनंतानुबंधी कषाय जातील. मग आपोआपच क्षयोपशम होत राहील.

आता दुसरा उपाय हा आहे की, आम्ही त्याला भेदज्ञान करून देतो. तेव्हा सारे कषाय निघून जातात, संपून जातात. हे या काळातील आश्चर्य आहे. म्हणून याला 'अक्रम विज्ञान' म्हटले आहे ना!

**जय सच्चिदानंद**

## संपर्क सूत्र

### दादा भगवान परिवार


**अडालज** : **त्रिमंदिर**, सीमंधर सिटी, अहमदाबाद-कलोल हाईवे,
पोस्ट : अडालज, जि.-गांधीनगर, गुजरात - 382421
**फोन :** 9328661166, 9328661177
E-mail : info@dadabhagwan.org

**मुंबई** : **त्रिमंदिर,** ऋषिवन, काजुपाडा, बोरिवली (E)
फोन : 9323528901

| | | | |
|---|---|---|---|
| **दिल्ली** | 9810098564 | **बेंगलूर** | 9590979099 |
| **कोलकता** | 9830080820 | **हैदराबाद** | 9885058771 |
| **चेन्नई** | 7200740000 | **पूणे** | 7218473468 |
| **जयपुर** | 8890357990 | **जलंधर** | 9814063043 |
| **भोपाल** | 6354602399 | **चंडीगढ** | 9780732237 |
| **इन्दौर** | 6354602400 | **कानपुर** | 9452525981 |
| **रायपुर** | 9329644433 | **सांगली** | 9423870798 |
| **पटना** | 7352723132 | **भुवनेश्वर** | 8763073111 |
| **अमरावती** | 9422915064 | **वाराणसी** | 9795228541 |

**U.S.A.** : **DBVI Tel. :** +1 877-505-DADA (3232),
**Email :** info@us.dadabhagwan.org

**U.K.** : +44 330-111-DADA (3232)

**Kenya** : +254 722 722 063

**UAE** : +971 557316937

**Dubai** : +971 501364530

**Australia** : +61 421127947

**New Zealand** : +64 21 0376434

**Singapore** : +65 81129229

**www.dadabhagwan.org**



## क्रोधापेक्षा शीलचे सामर्थ्य विशेष

क्रोध-मान-माया-लोभ, या साऱ्या गोष्टी म्हणजेच कमकुवतपणा. जो बलवान आहे त्याला क्रोध करण्याची गरजच कुठे पडते ? आणि हा तर क्रोधाने समोरच्याला वश करायला जातो. पण ज्याच्याकडे क्रोध नाही, त्याच्याकडे दुसरे काहीतरी असेलच ना! त्याच्याजवळ 'शील' नावाचे जे चारित्र्य असते, त्यामुळे तर पशू देखील वश होऊन जातात. वाघ, सिंह, शत्रू आणि संपूर्ण सैन्य, सर्वच वश होऊन जातात!

\- दादाश्री

dadabhagwan.org

ISBN 978-81-89933-47-0

9 788189 933470

Printed in India

Price ₹10